**बाष्पके संचालनालय या आस्थापनेचे बळकटीकरण करणे या योजनेअंतर्गत भारतीय बाष्पके अधिनियम, १९२३ (संशोधित २००७) बाबत जनजागृतीसाठी चर्चासत्राचे आयोजन करण्यासाठी निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. बाष्पके-०६१७/प्र.क्र.२९/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ जुलै, २०१७

वाचा :-१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.एसबीई-०३/२०१०/ प्र.क्र.८/कामगार-१, दि. ८ फेब्रुवारी, २०११.
२) प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय यांचे पत्र क्र.कक्ष-४/लेखाशाखा/ २०१७/२३३१०, दिनांक ८/६/२०१७.

शासन निर्णय :-

बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण करणे व बाष्पके अधिनियमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे, या योजनेअंतर्गत, सन २०१७-१८ साठी उपलब्ध करून देण्यात आलेला ₹ १०,७३,१००/- (₹ दहा लक्ष त्र्याहत्तर हजार शंभर फक्त) इतका निधी, भारतीय बाष्पके कायदा अधिनियम,१९२३ (संशोधित २००७) बाबत जनजागृती करण्याच्या अनुषंगाने, सोलापूर व अहमदनगर या विभागीय कार्यालयात चर्चासत्र आयोजित करण्यासाठी खर्च करण्यास, बाष्पके संचालनालयातील संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम मासिक निधी वितरणपत्राप्रमाणे खर्च करण्यात यावी. तसेच याबाबत वित्तिय मर्यादा व प्रचलित नियम व तरतूदींचे काटेकोर पालन करण्यात यावे.

३. सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार, प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील संबंधित कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

४. वरील योजनांसाठी होणारा खर्च, मागणी क्र.के-४, मुख्यलेखाशिर्ष २२३०- कामगार व सेवायोजन, ०१ कामगार, १०२ कामाची परिस्थिती व सुरक्षितता, (००)(१५) बाष्पके संचालनालयाचे बळकटीकरण व बाष्पके अधिनियमाची प्रभावी अंमलबजावणी (२२३०५७८४) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-२०१८ या वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यांत यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३, दिनांक १८/४/२०१७ आणि शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०/६/२०१७ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याच्या अधीन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०७३११२०४२७५३१० असा आहे. हा शासन निर्णय, डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Mandar Karnik
Date: 2017.07.31 12:10:49 +05'30'

**( मं.र.कर्णिक )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद सदस्य,
३) प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय कामगार भवन, ७ वा मजला, प्लॉट नं.सी-२०, ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रे (पू.), मुंबई-४०० ०५१.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/ अहमदनगर.
६) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग, कार्यासन (व्यय-१६ व अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (प्रशासन-१) उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कामगार-१) उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.